**पदनिर्मिती, पदभरती व पदांचे पुनरूज्जीवन**
**याबाबतचे निर्बंध व अनुषंगिक आढावे**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**

शासन निर्णय क्रमांक : शासाउ-१०.०२/प्र.क्र.२७/२००३/सा.उ.
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १६ जून, २००३

वाचा :- शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक : असंक-१००१/प्र.क्र.२९/२००१/वित्तीय सुधारणा, दिनांक १० सप्टेंबर, २००१.

**-: शासन निर्णय :-**

उपक्रमांच्या खर्चामध्ये आवश्यक प्रमाणात बचत करण्याच्या हेतून आणि उपक्रमाच्या कामकाजात पारदर्शकता येण्यासाठी व कामकाजात सुटसुटीतपणा आणण्याच्या दृष्टीने शासनाने शासकीय उपक्रमांसाठीसुध्दा विविध काटकसरीच्या उपाययोजना वेळोवेळी निर्गमित केलेल्या आहेत. सदर उपाययोजनांचे अनुपालन सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम/मंडळे/महामंडळे आणि इतर स्वायत्त संस्था यांच्याकडून काटेकोरपणे अंमलबजावणी होणे आवश्यक आहे. शासनाने शासकीय विभागांसाठी दिनांक १०.९.२००१ च्या आदेशाद्वारे याचविषयी सर्वसमावेशक आदेश काढण्यात आले आहेत, तसेच आदेश शासकीय उपक्रमांसाठी काढण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. आता शासन निर्णयासोबतच्या जोडपत्र "अ" व "ब" मध्ये विहित केल्यानुसार शासन आदेश देत आहे. सदर आदेशांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.

२. आपल्या नियंत्रणाखालील सार्वजनिक क्षेत्रातील सर्व उपक्रम/मंडळे/महामंडळे इत्यादी संस्थांमध्ये या शासन निर्णयांची अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित उपक्रम व प्रशासनिक विभागाची राहिल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(सु. तु. शेंडे)
शासनाचे अवर सचिव

प्रति,

1. मा. राज्यपालांचे सचिव,
2. मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव,
3. सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव
4. सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
5. मंत्रालयातील सर्व प्रशासकीय विभाग,
6. सर्व राज्य शासकीय सार्वजनिक उपक्रमांचे व्यवस्थापकीय संचालक/मुख्य कार्यकारी अधिकारी,
7. महालेखापाल (लेखा परीक्षा), मुंबई,/नागपूर,
8. महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परीक्षा), मुंबई.
9. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
10. वित्त विभागातील सर्व कार्यासने,
11. निवड नस्ती, सार्वजनिक उपक्रम.

## जो ड प त्र (अ)

## सार्वजनिक उपक्रमांच्या लेख्यांना अंतिम स्वरुप देणे व लेखे विधानमंडळास सादर करणे

कंपनी अधिनियम १९५६ अंतर्गत कलम १६६, २१०, २३०, ६१९ आणि ६१९ (ब) आणि भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक यांचे (कार्य, शक्ती व सेवाशर्ती) अधिनियम, १९७१ कलम-१९ प्रमाणे कंपन्यांच्याबाबतीत दरवर्षी आर्थिक वर्ष संपल्यानंतर सहा महिन्यांच्या आत लेख्यांना अंतिम रुप देणे व त्यांचे लेखापरिक्षण होणे आवश्यक आहे. तसेच सदर लेखे आर्थिक वर्षाच्या समाप्तीनंतर ९ महिन्यांच्या आत विधानमंडळास सादर करणे आवश्यक आहे. सांविधानिक महामंडळांच्याबाबतीत लेख्यांना अंतिमरुप देणे, लेखापरिक्षण होणे व विधीमंडळाचे पटलावर त्यांचे सादरीकरण करणे, संबंधित अधिनियमानुसार आवश्यक आहे. शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, ६० शासकीय कंपन्यांपैकी १६ कंपन्यांनी आणि ५ पैकी ३ सांविधिक महामंडळांनी त्यांच्या लेख्यांना निर्धारीत कालावधीत अंतिमरुप दिले. उर्वरीत महामंडळांच्याबाबतीत अधिनियमानुसार आवश्यक ती कार्यवाही विहित कालमर्यादेत झालेली नाही. ही बाब विचारात घेऊन सार्वजनिक उपक्रमांच्या लेखापरिक्षक नेमणे, लेख्यांना अंतिम स्वरुप देणे या बाबींसंदर्भात खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत.

1. सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रमांनी अंतर्गत लेखापरिक्षण कक्ष स्थापन करावा (असा कक्ष यापूर्वी स्थापन केलेला नसल्यास) सदर कक्ष स्थापन करण्यासाठी नवीन पदे निर्माण करण्यात येऊ नयेत. असा कक्ष उपक्रमातील मंजूर पदांमधून समायोजनाने निर्माण करण्यात यावा व उपक्रमाच्या लेख्यांचे अंतर्गत लेखापरिक्षण सदर कक्षाने सातत्याने करावे.

2. उपक्रमांचे लेखे कालबध्द कार्यक्रम आखून विहित कालमर्यादेत पूर्ण होतील याकडे उपक्रमाच्या व्यवस्थापनाने लक्ष द्यावे आणि सांविधिक लेखापरिक्षकांची नेमणूक वेळेवर होईल यासाठी भारताचे नियंत्रक व महालेखापरिक्षक कार्यालयाकडे पाठपुरावा करावा. लेखे वेळेवर पूर्ण होऊन लेखा परिक्षा विहित कालमर्यादेत पूर्ण करून विधानमंडळाच्या पटलावर सादर करण्याची जबाबदारी उपक्रमाच्या व्यवस्थापकीय संचालकांवर राहिल. त्यामुळे व्यवस्थापकीय संचालकांनी लेखे विहित कालमर्यादेत पूर्ण होतील या दृष्टीने कालबध्द कार्यक्रम आखून कार्यवाही पूर्ण होईल याची दक्षता घ्यावी.

3. उपक्रमांच्या कामकाजामध्ये सुटसुटीतपणा येण्यासाठी उपक्रमांनी स्वत:चे निरीक्षण व दक्षता पथक कार्यान्वित करावे. यासाठी पदे अंतर्गत समायोजनाने उपलब्ध करावीत. जेणे करून उपक्रमांच्या कामकाजात शिस्त येईल.

**जोडपत्र-ब**

(१) **पदांचा व योजनांचा आढावा**

**पदांचा आढावा**

१.१ सर्व उपक्रमांनी त्यांच्या आस्थापनेवरील सर्व पदांचा आढावा (परिच्छेद १.३ व १.४ अनुलक्षून) घ्यावा व त्याबाबतचा अहवाल प्रशासकीय विभागास तसेच वित्त विभागास पुनर्विलोकन व संमतीसाठी पाठवावा. आढाव्याअंती अतिरीक्त ठरणारा अधिकारी/कर्मचारीवृंद शासनास कळवावा.

१.२ ज्या योजना, कार्यक्रम व आस्थापना यांचेसाठी कामाची व कर्मचाऱ्यांची मानके विहित करण्यात आलेली आहेत तसेच काही कामे/योजना/कार्यक्रम संपत आलेले आहेत त्या ठिकाणी कर्मचाऱ्यांची असमान उपलब्धता निर्माण झालेली आहे अशा प्रकरणी संबंधित उपक्रमांनी त्वरेने कार्यवाही करुन ज्या ठिकाणी कर्मचारी आवश्यक आहेत त्या ठिकाणी समायोजनाने उपलब्ध करुन देऊन त्यांच्या सेवा परिपूर्ण वापरल्या जातील याची खातरजमा करावी. ही कार्यवाही सर्वसाधारण आढाव्याच्या जागेवर अतिशिघ्रतेने केली जावी.

१.३ पदांचा काटेकोरपणे आढावा घेतांना प्रत्येक उपक्रमाने आपल्या विभागांच्या आधुनिकीकरण व संगणकीकरणाच्या पार्श्वभूमीवर संरचनात्मक बदल करणे शक्य झाले असल्याने तेही विचारात घेऊन पदांची जुनी मानके पुनर्विलोकित करावी व त्या प्रमाणे अधिकारी/कर्मचारी यांची संख्या नियोजित करावी.

**योजनांचा आढावा**

१.४ सर्व उपक्रमांनी त्यांच्याकडील सर्व योजनांचा आढावा घेऊन ज्या योजना कालबाह्य झालेल्या आहेत त्या बंद करुन व जेथे योजनांचे एकत्रिकरण करणे शक्य आहे तेथे तसे करुन अतिरीक्त ठरणाऱ्या पदांबाबत/ खालीलप्रमाणे कार्यवाही करावी.

(i) शासन निर्णय दिनांक १८/१२/९२ च्या तरतूदीनुसार उपक्रमामधून सेवानिवृत्तीची कार्यवाही करावी.

(ii) सार्वजनिक उपक्रमाच्या व्यवस्थापनाने अथवा प्रशासकीय विभागाने पर्यायी नियुक्ती देण्याबाबत कोणत्याही प्रकारे बांधिलकी स्विकारु नये अथवा त्यासंबंधात आश्वासन देऊ नये.

(iii) मात्र बंद करण्यात आलेल्या उपक्रमातील कपात करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना पुनर्नियुक्ती देण्यासाठी राज्य शासनाचे इतर सार्वजनिक उपक्रम त्यांच्याकडे रिक्त पदे उपलब्ध असल्यास विचार करु शकतील. जर सदर कर्मचारी नवीन नियुक्तीच्या पदाकरीता आवश्यक असलेल्या इतर सेवा अर्हता विषयक अटी पूर्ण करत असतील तर त्यांना केवळ वयाची अट शिथिल करुन नेमणूक देता येईल. याबाबतीतसुध्दा पुनर्नियुक्त पदावर त्याची

सेवा नवीन नेमणूक असे समजण्यात यावे. त्यांना पूर्वीच्या सेवेचा कोणत्याही प्रकारचा लाभ अनुज्ञेय असणार नाही.

(iv) आवश्यक असेल तेथे बंद करण्यात यावयाच्या सार्वजनिक उपक्रमांशी संबंधित प्रशासकीय विभागाने तांत्रिक शिक्षण विभागाशी सल्लामसलत करून कपात करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना पुन: प्रशिक्षण (Retraining) देण्याकरीता कार्यवाही करावी. असे करताना राष्ट्रीय नवनिर्माण निधीमधील रकमांच्या विनियोगाबाबत केंद्र शासन जी मार्गदर्शक तत्वे विहित करील ती कृपया लक्षात घ्यावी.

१.५ (अ) प्रत्येक उपक्रमाने सन २०००-०१ अखेरीस अस्तित्वात असलेल्या **सर्व पदांचा व योजनांचा आढावा विशेष कार्यक्रम आखून दिनांक ३१ ऑगस्ट २००३ पूर्वी पूर्ण करावा.**

(ब) तद्‌नंतर असाच आढावा दरवर्षी ३१ ऑगस्ट पर्यंत घेण्यात यावा व आढाव्याचे निष्कर्ष प्रशासकीय विभागामार्फत वित्त विभागास सादर करावेत.

## (२) नवीन पदे निर्माण करणे

### पदे निर्माण करण्यावरील निर्बंध

२.१ विनिर्दिष्टपणे मंत्रिमंडळाची मान्यता मिळालेल्या योजनांच्या बाबतीतील प्रकरणे वगळता, नवीन पदे (अंशकालीन पदांसह) निर्माण करण्यावर निर्बंध राहतील.

२.२ **आस्थापनांचा व योजनांचा सर्वंकष आढावा (परिच्छेद-१.३ ते १.४ अन्वये घेऊन तो यथास्थिती प्रशासकीय विभागामार्फत वित्त विभागाकडून मान्य झाल्यानंतरच** अत्यावश्यक असल्यास नवीन पदनिर्मितीचे प्रस्ताव यासोबत जोडलेल्या विवरणपत्र-१ तसेच पदभरतीच्या प्रस्तावासंबंधी माहिती सोबत जोडलेल्या विवरणपत्र-२ मधील तपशिलांसह) संबंधित प्रशासकीय विभागांनी सचिवांचे स्तरावर मान्यता घेऊन वित्त विभागास सादर करावेत.

२.३ वित्त विभागाने मान्यता दिल्यानंतर सर्व प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता घेण्याची आवश्यकता नाही. फक्त उप सचिव व त्यावरील वेतनश्रेणीची नवीन पदे निर्माण करण्याच्या प्रस्तावास मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात यावी. उप सचिव व त्यापेक्षा वरील श्रेणीची पदे, तसेच त्यापेक्षा खालील वेतनश्रेणीची पदे निर्माण करण्याचा संयुक्त प्रस्ताव असेल तर या प्रस्तावासही मंत्रिमंडळाची मान्यता घेण्यात यावी.

### हंगामी आस्थापना

२.४ सध्या विशिष्ट प्रकारच्या कामांसाठी काही विभागांमध्ये अल्पावधीसाठी हंगामी जागा वेळोवेळी निर्माण केल्या जातात.

**यापुढे हंगामी पदे निर्माण करू नयेत व ती भरण्यात येऊ नयेत, हंगामी स्वरूपाची कामे ज्या विभागांमध्ये सध्या केली जातात ती यापुढे कंत्राटी पध्दतीवर करून घेण्यात यावीत, हंगामी व रोजंदारी कर्मचारी नेमण्यात येऊ नयेत.**

**रोजंदारीवर मजूर घेणे**

२.५ ज्या अधिकाऱ्यांना, त्यांनी प्रशासित केलेल्या योजनांची यशस्वीपणे अंमलबजावणी करण्याकरीता, रोजंदारीवरील कर्मचारी घेण्याचे किंवा नैमित्तिक कामगार कामावर लावण्याचे अधिकार देण्यात आले आहेत ते अधिकार याद्वारे निलंबित करण्यात येत असून, केवळ टंचाई परीस्थितीत व नैसर्गिक आपत्तीच्या काळात ज्या विविध विभागांचा टंचाई व आपत्ती निवारणाशी संबंध येईल त्यांना रोजंदारीवर मजूर घेण्याची गरज निर्माण होईल त्याबाबतीत जिल्हाधिकारी यांनी विभागीय आयुक्तांचे सहमतीने अशी परवानगी विवक्षित कालावधीसाठी त्या-त्या कार्यालयांना द्यावी.

२.६ **कोणत्याही विभागाने रोजंदारीवर किंवा हंगामी तत्वावर कर्मचाऱ्यांची नियुक्ती करु नये.** रोजंदारी हंगामी तत्वावर कर्मचाऱ्यांची नियुक्ती केल्यास उपक्रम व यथास्थिती प्रशासनिक विभागाने संबंधित अधिकारी/कर्मचारी यांचेवर खातेनिहाय चौकशी करुन शिस्तभंगाची कारवाई करावी.

## (३) पदांचे व्यपगत होणे व पुनरूज्जीवन

**पदांचे व्यपगत होणे व पुनरूज्जीवन करणे.**

३.१ सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त असलेली पदे व्यपगत होतात. जी पदे रिक्त झालेली आहेत व ज्यांचा अतिरीक्त कार्यभार इतर अधिकारी/कर्मचाऱ्यांस दिला आहे ती पदे रिक्त झाल्याच्या दिनांकापासून ६ महिन्यात नियमित स्वरुपात न भरल्यास व्यपगत झाली असे समजण्यात यावे. अशी पदे पुनरूज्जीवीत करणे आवश्यक असल्यास प्रशासकीय विभागाने सदरहू पदे कोणत्या दिनांकापासून रिक्त आहेत, या पदास शेवटची मुदतवाढ कोणत्या आदेशान्वये किती कालावधीपर्यंत दिली आहे. तसेच या पदाची आवश्यकता का आहे याबाबत योग्य ते समर्थन देऊन प्रस्ताव वित्त विभागाकडे अभिप्रायासाठी पाठवावा.

३.२ अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग आणि विमुक्त जाती व भटक्या जमाती या सामाजिक घटकांना जे घटनादत्त आरक्षण आहे त्या आरक्षणाप्रमाणे अनुशेषांतर्गत असलेली पदे ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त राहिली तरी ती व्यपगत होणार नाहीत आणि ही पदे भरण्यासाठी उच्चस्तरीय सचिव समितीची मान्यता आवश्यक असणार नाही.

३.३ पद रिक्त झाल्यापासून सहा महिन्यांचे आत पद भरतीस मान्यता मागणारा प्रस्ताव वित्त विभागास सादर झाला तर त्या प्रस्तावातील पद/पदे व्यपगत होणार नाहीत. मात्र असे प्रस्ताव सहा महिने पूर्ण होण्यापूर्वी किमान एक महिना अगोदर संबंधित प्रशासनिक विभागांनी वित्त विभागास सादर करावयास पाहिजे.

३.४ उपक्रमांमध्ये ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असलेली पदे पुनरूज्जीवीत न करता भरण्यात येतात. यावर आळा घालण्यासाठी ६ महिन्यांपेक्षा जास्त कालावधीसाठी रिक्त असलेली पदे पुनरूज्जीवीत न करता भरण्यात आल्यास ज्या अधिकाऱ्याने ती भरण्याची कार्यवाही केली आहे त्याचेवर योग्य ती जबाबदारी निश्चित करून प्रथम कारवाई केल्याशिवाय पदे पुनरूज्जीवीत करण्याचा प्रस्ताव वित्त विभागाच्या संमतीसाठी पाठविता येणार नाही.

## (४) <u>पद भरती</u>

**नवीन निर्माण केलेली, पुनरूज्जीवित केलेली व रिक्त पदे भरणे**

४.१ वित्त विभागाने पद भरतीस मान्यता दिलेली पदे वगळता रिक्त पदे भरता येणार नाहीत.

४.२ योजनांतर्गत किंवा योजनेतर प्रयोजनांसाठी नवीन पदे निर्माण केल्यावर अंमलबजावणीच्या सर्व प्राथमिक बाबी पूर्ण झाल्याशिवाय पदे भरण्यात येऊ नयेत.

४.३ ४५ दिवस किंवा त्याहून कमी दिवस रजा असल्यास त्या रजेच्या मुदतीत त्या पदावर पदोन्नती देण्यात येऊ नये.

४.४ वित्त विभागाच्या मान्यतेनंतर पदोन्नती, बदली, प्रतिनियुक्ती, इत्यादी द्वारे पदे भरावयाची असल्यास ती भरण्याची कार्यवाही पदे रिक्त झाल्यापासून ६ महिन्यांचे आत करावी.

४.५ उपक्रमांनी रिक्त झालेले पद न भरावयाचे ठरविल्यास ते पद रद्द करण्याबाबतचे आदेश त्वरीत निर्गमित करावेत.

४.६ हे आदेश निर्गमित करावयाच्या तारखेपूर्वी सेवा प्रवेशासाठी उमेदवारांची लेखी परीक्षा घेणे, उमेदवारांच्या अंतिम निवड याद्या तयार करणे, उमेदवारांच्या शिफारशी/नियुक्त्या करणे अशा प्रकारची आगाऊ कार्यवाही पूर्ण करण्यात आली आहे अशा प्रकरणात वरील निर्बंध लागू राहणार नाहीत.

वित्त विभागाने पदे भरण्यास मान्यता दिल्यानंतर अशी पदे भरतांना अपंग/अंध/मूकबधिर, स्वातंत्र्य सैनिकांचे वारस व सन १९९१ चे कार्यमुक्त जनगणना कर्मचारी, अंशकालीन कर्मचारी, सेवानिवृत्त चतुर्थश्रेणी कर्मचाऱ्यांचे वारस यांच्या संदर्भात व अनुकंपा तत्वावर नियुक्ती संदर्भात सामान्य प्रशासन विभागाने व सफाई कामगारांच्याबाबतीत लाड समितीच्या शिफारशींवर नगर विकास विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या सूचना लागू राहतील.

४.७ सेवानिवृत्तीच्या कारणामुळे रिक्त होणाऱ्या तसेच सरळसेवा प्रवेशाने भरावयाच्या पदांबाबतचे नियोजन किमान १ वर्ष अगोदर प्रत्येक उपक्रमाने/विभागाने निश्चित करावे व तसे त्यांच्या नियंत्रणाखालील कार्यालयांकडून प्रस्ताव मागवून पदे भरण्याबाबतचे प्रस्ताव वित्त विभागास सादर करावेत.

४.८ वित्त विभागाच्या मान्यतेनंतर पदोन्नती, बदली, प्रतिनियुक्ती, इत्यादीद्वारे पदे (मागासवर्गीयांचा अनुशेष वगळून) भरावयाची असल्यास ती भरण्याची कार्यवाही पद रिक्त झाल्यापासून ६ महिन्यांचे आत करावी.

४.९ उपक्रमाने/विभागाने रिक्त झालेले पद न भरावयाचे ठरविल्यास ते पद रद्द करण्याबाबतचे आदेश त्वरीत निर्गमित करावेत.

४.१० हे आदेश निर्गमित करावयाच्या तारखेपूर्वी सेवा प्रवेशासाठी उमेदवारांची लेखी परीक्षा घेणे, मुलाखती घेणे, उमेदवारांच्या अंतिम निवड याद्या तयार करणे, उमेदवारांच्या शिफारशी/नियुक्त्या करणे अशा प्रकारची आगाऊ कार्यवाही पूर्ण करण्यात आली आहे अशा प्रकरणात वरील निर्बंध लागू राहणार नाहीत.

**शासन निर्णय, क्रमांक : शासाउ-१०.०२/प्र.क्र.२७/२००३/सा.उ., दिनांक १६ जून, २००३ सोबतच्या सहपत्रातील विवरणपत्र.**

## वि व र ण प त्र - एक

## नवीन पदनिर्मिती व व्यपगत झालेली पदे पुनरूज्जीवित करण्याबाबतचा प्रस्ताव

**सार्वजनिक उपक्रमातील पदांचा सर्वंकष आढावा घेतल्याचा दिनांक...............**

| अ.क्र. | सार्वजनिक उपक्रमाचे नाव | कार्यालयाचे नाव | प दां चा त प शी ल | | | | | | नवीन पदे निर्माण/पुनरूज्जीवीत केल्यानंतर पदे भरण्यासाठी विहित पध्दतीनुसार अपेक्षित समयमर्यादा | | प्रत्येक पदाचा वित्तीय भार (रूपये लाखात) | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | | पदनाम | वेतनश्रेणी | एकूण पदांची संख्या | नवीन पद निर्मितीच्या पदांची संख्या | पुंनरूज्जीवीत करावयाच्या पदांची संख्या (पद रिक्त झाल्याचा दिनांक दर्शविणारे विवरणपत्र जोडावे) | पदे आरक्षणातील आहेत किंवा कसे? असल्यास, तपशील | महिने | वर्ष | २००२-०३ | २००३-०४ |
| १ | २ | ३ | (४-अ) | (४-ब) | (४-क ) | (४-ड) | (४-इ) | (४-फ) | (५-अ ) | (५-ब) | (६-अ) | (६-ब) |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |
| | | | | | | | | | | | | |

**टिप : विविक्षित विशेष प्रयोजन वगळता नवीन पद निर्मितीचा प्रस्ताव विचारार्थ घेण्याआधी उपरोक्त सर्वंकष आढावा पूर्ण झालेला असावा.**

**व्यवस्थापकीय संचालकांची सही/-**

**मंत्रालयीन सचिवांची सही ...........**

**शासन निर्णय, क्रमांक : शासाउ-१०.०२/प्र.क्र.२७/२००३/सा.उ. दिनांक १६ जून, २००३ सोबतच्या सहपत्रातील विवरणपत्र.**

**वि व र ण प त्र - दोन**

**रिक्त पदे भरण्यासाठी वित्त विभागास सादर करावयाच्या प्रस्तावाचे विवरणपत्र**

**विभागाचे / उपक्रमाचे नांव :-**

**दूरध्वनी क्रमांक :**

| अ.क्र. | पदाचे नाव | एकूण पदे | पदांची वेतनश्रेणी, सरासरी वेतन व वार्षिक आर्थिक भार | पदे कधीपासून रिक्त आहेत व ती का? | पदांना मुदतवाढ देण्यात आली होती काय? असल्यास कधी व केव्हापर्यंत | पद भरण्याची आवश्यकता काय? | प्रत्यार्पित करण्यात येणारी पदे त्यातून प्राप्त बचत | शेरा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |
| | | | | | | | | |

*************